



# गो विं दा







संपादक –
अहं ब्रह्मास्मि (पुणे)
अतिथी संपादक -
अरविंद चौधरी

सहसंपादक –
सारंग भणगे (पुणे)
सचिन काकडे (मुंबई)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)

हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी
तसे सूचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी
mailto:netaksharee@gmail.com



ज्या-ज्या वेळी पृथ्वीवर असूर प्रवृत्ती वाढतात, तेंव्हा त्यांचा विनाश करण्यासाठी या धरतीवर श्रीविष्णूंचा अवतार होतो. निसर्गाचा समतोल राखण्यासाठी निसर्ग आपली आपणच ही काळजी घेतो. 'श्रीकृष्णावतार' हा श्रीविष्णूंच्या तेवीस अवतारांमधील सर्वात महत्वाचा अवतार मानला जातो. ज्या वैवस्वत मन्वंतरातील तेवीसाव्या द्वापार युगात हा अवतार घडला तेंव्हा सर्वत्र अधर्म माजला होता. श्रीकृष्णांनी तो अधर्म नेस्तनाबूत करून त्या जागी धर्माची स्थापना केली आणी भूमीवरील भार हलका केला.

श्री कृ ष्ण. . . . . एक अलौकिक. . परिपूर्ण योगी पुरुष. सोळा कलांनी युक्त, चतुरस्त्र व्यक्तिमत्व. निष्काम कर्मयोगाचा जो उपदेश त्यांनी रणांगणात अर्जुनाला केला तो म्हणजे अखील-मानवजातीला त्यांनी दिलेली एक अनमोल देणगीच आहे. 'श्रीमद्‌भगवतगीता' हा त्यांनी रचलेला दिव्य ग्रंथ जगातील प्रत्येक मानवास अंधारातून प्रकाशाकडे नेण्यास संपूर्ण समर्थ आहे. महर्षी अंगीरसांकडून त्यांनी या निष्काम कर्मयोग रुपी यज्ञाचे धडे घेतले होते, व स्वतःच्या आयुष्यात हा योग अंगीकारून ते 'तृप्त' म्हणजेच 'पूर्ण' पुरुष झालेले होते.

ज्ञानाचा अथांग सागर असलेले श्रीकृष्ण खळाळत्या नदीप्रमाणे मनमोहक आहेत. त्यांच्या लीला, विशेषतः बालपणीचा त्यांचा खट्याळपणा मनाला भूरळ पाडतो. गोकुळ आणी व्रजभूमीतील त्यांच्या रसाळ लीलांमागे काही गूढ अध्यात्मिक खुणा आढळून येतात.

श्रीकृष्णांचा जन्म कारागृहात झाला. त्यांचे लौकिक पिता श्री वसुदेव व माता देवकी यांना कंसाने बंदी बनऊन ठेवलेले होते. यामागचा संकेत पाहिल्यास 'कंस' हा विकारांचे द्योतक आणी वसुदेव-देवकी म्हणजे त्या विकारांनी जखडून ठेवलेले मानव असा अर्थ सहज काढता येतो. पण कृ ष्ण बंदीवासातून बाहेर पडलेले आहेत, इतकेच नव्हे तर पुढे त्यांनी कंसाचा वध केलेला आहे, म्हणजेच ते पूर्णपणे विकारमुक्त झाल्याचे दिसून येते. श्रीकृष्ण-चरित्रातील प्रत्येक कथेमागे असे अर्थ-भांडार दडलेले आहे. या कर्मयोग्याच्या प्रत्येक लहान कृतीत असे खोलवर अध्यात्मिक संकेत आढळून येतील. फक्त मातीची हंडी फोडून आतलं दही मटकावण्याची कला आत्मसात करता यायला हवी



घरात आरसा, आरशात प्रतिबिंब, प्रतिबिंबात मी
माझ्यात बाळकृष्ण  हातात लोणी घेऊन खातोय कसा !

घरात आरसा, आरशात प्रतिबिंब, प्रतिबिंबात तू
तुझ्यात राधाकृष्ण  हातात बासरी घेऊन गातोय कसा !

घरात आरसा, आरशात प्रतिबिंब, प्रतिबिंबात गोकुळ
गोकुळात गोपालकृष्ण  गोपांना काला करुन देतोय कसा !

घरात आरसा, आरशात प्रतिबिंब, प्रतिबिंबात वृंदावन
वृंदावनी गोपीकृष्ण, प्रत्येक गोपीबरोबर रास खेळतोय कसा !

घरात कृष्ण, आरशात कृष्ण, प्रतिबिंबात कृष्ण,
आरशाच्या चौकटीत कृष्ण, इकडे कृष्ण, तिकडे कृष्ण,
लबाड कृष्ण आपल्याकडे पाहून हसतोय कसा !

**-- अरविंद चौधरी**

सव्वाशे वर्षांचे आयुष्य, लाभले होते श्री कृष्णाला. . .
त्यातला एक सुद्धा क्षण, तो स्वतःसाठी नाही जगला. . .

आठवू कृष्णाचे बाळपण, अनंताच्या अनंत लीला. .
नित्य चारावया धेनुस जाई, गोपांसवे करे गोपाळकाला. .

यशोदामाईस आनंद देण्या, ना ना गमती करू लागला. .
बांधु दिले यशोदामैय्याला, स्वतःस परब्रह्माने उखळाला. .

गोपाळ गोकुळी असताना, गोपांसारखाच राहिला. .
नाही नेसली भारी वस्त्रे, कृष्ण लंगोटीवरच राहिला. .

केला ज्यांचा ज्यांचा वध, उद्धरिले त्या सर्वांना. .
ज्यांना ज्यांना दिला दंड, शापमुक्त केले सर्वांना. .

अर्जुनास कथन केली गीता, कुणासाठी? अहो, आपल्यासाठी. .
आचारसंहिता सर्वांना सांगून, जगला कृष्ण फक्त इतरांसाठी . .

**-- अरविंद चौधरी**



कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा, कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा
ऐकताच फुटे पान्हा, कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा

विसरतो मी स्वतःला, भक्तिरस घेरे मना
कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा, कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा

जन्मजात कान्हा तू रे, संकटांनी घेरलेला
दर पाऊली दैवाने , तुझ्या काटा रोवलेला
तरीही तू चेहरा तो, सदा हासराच ठेवला

प्रेरणाच देतो तव, इतिहास पुन्हा पुन्हा
कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा, कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा

भक्तासाठी तू रे कान्हा, अनवाणी धावलेला
राधेच्या नी मीरेच्याही, हाकेला तू पावलेला
अर्जुनाच्या रक्षणार्थ, सारथी तू जाहलेला

सदगदीत करते, मोहिनी ही तुझी मना
कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा, कृष्ण कृष्ण कान्हा कान्हा

**-- गीत**



कृष्ण वेडी, काळे मेघ
कृष्णाचा निखळ श्वास
राधेने झेलला
पदरात का वनवास. . .?

प्रेम नीर
विश्वासाचा फक्त भास
तहानलेला जीव
चटका लावणारी आस. . .

मनाचं दुःख ते
नाही वरवरचा त्रास
जाणून न जाणल्यास
कृष्ण वेडीचा प्रवास. . .

**-- चैताली म्हापसेकर**

नादवेडी संध्याकाळ अडकली बासरीत
खुळावले वारे शांत गोकुळात

परतल्या गाईचे चिखलात खूर
आसमंतात पसरले कृष्ण बासरीचे सूर

राधा संमोहित श्याम संध्यामग्न
सहवासास आतुर रुक्मिणी नग्न

विश्वरूप साकार अवतरले भूतली
शोधे श्रीहरीस मीरेची सावली

करूणा कबीराच्या आर्त हाका
सूरदास चक्षुंचा श्रीकृष्ण सखा

शोधितो आत्मा हरीचे ब्रह्मज्ञान
गांडीवाच्या प्रत्यंचेवरी धर्माचा बाण

**-- विजयकुमार**



कान्ह्याची बासरी. . .  राधेचा श्वास
यमुनेच्या तीरी. . .  राधाकृष्णाचा वास

बासरीचा सूर. . .  प्रेमाचे तरंग
राधेसवे कान्हा. . .  रासक्रिडेत दंग

प्रेमाची नाती . . . पण नियमांनी बद्ध
युगांची सोबत. . .  पण शापाने विद्ध

देवत्व अंगी. . .  परी मनुष्य जन्म
पुन्हा मानवी नियमांनी तोही बद्ध

राधे मान्य. . .  दुःख असेल अमाप
फुंकर घालायला नसेल तो समीप

पण खरंच सांग. .  तुही प्रेमालाच बघीतलंस?
की त्या अवतारातील कृष्णाला बघीतलंस??

अग नव्हताच ध्यास प्रेमाचा. . .
पण तरी होता ओलावा मनाचा. .

ध्यास तर होता अवतार कर्माचा
त्या गीतेचा  त्या भरतखंडाच्या उद्धाराचा. . .

राधे तू तर होतीस ना कृष्णाचेच मन ?
मग नाही समजले का तुलाही तेच मन ??

त्या निळया कृष्णाच्या निळाईतील तू राधा
एकरूप. . .  समरूप. . .
वेगळी तरी समीपच असलेली तू राधा

***-- अमित वि डांगे***



यशोदेच्या हातांनी
चला झुलवूया झुला
चित्ती कान्हा पाहुया
या गोविंदा करुया

अंगत-पंगत मांडून अंगणी
घासामध्ये घास मिसळूनी
अमृत गोडी चाखूया
या गोविंदा करुया

उंच बांधली शिंकाळी
हाता पल्याडच लोणी
गोपगड्यांत वाटूया
या गोविंदा करुया

खांद्याला लावून खांदा
उभा करू पायावर पेंद्या
गोवर्धना काठ्या लावूया
या गोविंदा करुया

लज्जारक्षणा पुरवू तागा
द्रौपदीस थाळीमधला
उरला दाणा दावूया
या गोविंदा करुया

रुळवू सुमधुर बासरी
सुदर्शनही असूदे साथी
अराजका वेळी मोडूया
या गोविंदा करुया

थरावर थर चढवूनी
शिकवण आचरू लाखांची
मीनार अशी उभारूया
या गोविंदा करुया

या गोविंदा करुया
या गोविंदा करुया

**-- स्वाती फडणीस**



मनतृष्णेच्या काठावरती चहूकडे मज तूच दिसशी
श्यामल रंग तुझा श्रीहरी रंगुनी जाते तुझ्यात मी अशी

मिठी मिठी तुझी बासुरी मुग्ध होतसे सारे प्राणी
चंचल चक्षुत तुझ्या माधवा सारी सृष्टी विरून जाती

गोड स्मिती त्या तुझ्या केशवा मधुचा स्वादहि फिका भासती
मथुरेत सुदामा नैन पसारे वाट पाहे मधुसुदनाची

नील यमुना डोहावरती तुझीच छबी आकार घेतसी
कालिया तो जणु देसी निमंत्रण फणा उभारुनी लीले खातीर

नीलमणीचा मयूर पंख हा मुकुट मुकुंदा शोभुनी दिसती
कान्हा कान्हा राधा करीती आजही वृंदावनी स्वर गुंज गुंजती

**-- दर्शना**

बासुरी वाजली रे रानी, नाद घुमला रे मनी
धावत आले मी वनी, कान्हा तुझीच रे मोहिनी

आले सोडुनिया सारे, भानही हरपले
पदर ढळला रे खाली, कान्हा का वाजवली बासुरी??

कुठे लपलास तू? का न मजशी दिसलास तू??
कुणा विचारु मी सांग, तुझे काय ठावठिकाण???

विचारले सा-यांस, वेली, तरू पक्षांस
दिसला का रे कान्हा सखा माझ्या जीवाचा

वारा अल्लड रे, कानात अलगुज करी
जलात रे यमुनेच्या, तुच मज दिसशी

का खेळसी तु लपंडाव, पंचप्राण व्याकुळले
तु न येता परतुन, प्राण माझे चालले

एक लकेर घुमली, निनादली बासुरी
माझा कान्हा येथेची रे, माझ्या ह्रदयमंदिरी

**-- स्वाती श्वेता**



कृष्ण संपला ??????

अहं. . . . . संपला तो फक्त अवतार.
कृष्ण. . . . . .  तो. . . तो मात्र आजही रेंगाळतोय.
तुझ्या माझ्या सा-यांच्याच मनात.

कुणाच्या मनात परमेश्वर म्हणून,
तर कुणाच्या प्रश्नचिन्ह बनून.
खरच! कधी कधी हसू येतं मला त्याचं. . . .
कसं निभावलं त्याने हे सारं??
आणि कसं निभावत असेल तो आजही. . .
कसं बघवत असेल त्याला. . त्याची गीता. . . . द्रौपदी सारखी. . .
भर कोर्टात विटाळताना.
त्याचं धर्मासाठीचं राजकारण. . . आजच्या अधर्माची ढाल बनताना.

खरंच. . . . . का नाही येत रे सावळ्या आता. . . .
तुझ्या लेकीची. . . .   तुझ्या गीतेची. . . लाज वाचवायला?????

का काळीयूगातल्या तुझ्या भक्तांसारखंच. .
तुझं मनही झालय पाषाणाचं ?
की तुही खेळतोयस पाठशिवणी. . . .
आम्हा या सा-याच आत्मांधांशी ?
त्या गांधारीसारखी. . . .  स्वतःच स्वतःच्या डोळयांवर पट्टी बांधून
हं. . . . .  असंच असेल तर. . . .
तर मग शेवट तो काय व्हायचा रे ??????
इथेही प्रतारणाच. . . . तुझी. . . . .  तुझ्या तत्वांची . . . .
तुझ्या धर्माची. .
आणी. . .    आणी त्या खेळाचीहि. .
कारण शोधयचंच नाही म्हणून. . . आम्ही फिरतोय.
आणी सापडायचंच नाही. . . . म्हणून तू.

**-- सुमन**



माझ्याहातून घडतील शंभर अपराध,
याची योजना तयारच होती तुझी.
फक्त अपराध करणं तेवढं माझ्या हाती. . .

आम्ही सगळे तुझीच रूपं ना रे ?
मग हा सर्व खेळ मांडलासच कशाला?
अन त्यातही मी असला रडका गडी का?

कदाचित एक इशारा द्यायचा असेल तुला,
माझ्या उदाहरणावरून. . . हा खेळ खेळणा-यांना.
पण मग यासाठी माझीच निवड का?

छे! छे! राग, दुःख, व्यथा काहीच नाही. . .
निव्वळ पडले काही प्रश्न. . . म्हणून. . .

खरंतर एक सुख अर्जुनालाही नाही लाभलं. . .
फार कमी जणांसाठी, देवा तुझं सुदर्शन धावलं.
असं तुझं ‘सुदर्शन’. . . ते तर फक्त मलाच झालं.

**-- श्रीधर**





**निवेदन —**

दि २ ऑगस्ट च्या नेटाक्षरी अंक क्र ३८ मध्ये 'मैत्रीण' या कवितेखाली श्री भुपेश कुंभार यांचे नाव अनवधानाने टाकले गेले आहे, ही कविता प्रत्यक्षात श्री संदीप खरे यांनी लिहिलेली आहे

चुकीबद्दल मनःपूर्वक दिलगीर आहोत

# अतिथी संपादकांविषयी थोडेसे



श्री. अरविंद चौधरी हे व्यवसायाने एक अभियंता आहेत. कवयत्री बहिणाबाईंच्या जळगावात ते रहातात. जीवनात विज्ञान, अभियांत्रीकी यांचा अभ्यास करता करता त्यांनी कवितेच्या प्रदेशातही आपला मुक्काम ठेवला आहे. त्यांची या मुक्कामाची सुरुवात हिंदी कवितांपासून झाली. सर्वश्री सुमित्रानंद पंतजी, भगवतीशरणजी, महादेवी वर्मा अशी सुरुवात करुन त्यांनी मराठीतील बहुतेक नामवंत कविवर्यांच्या कवितांचा आस्वाद घेतला.

कवितेप्रमाणेच त्यांना अध्यात्मातही विशेष गोडी आहे. ओशो, किरिटभाईजी, श्री श्री रविशंकरजी, कृपालुजी महाराज, सुखरामजी महाराज यांच्या दालनांमधून त्यांचा अध्यात्माचा प्रवास घडलेला आहे. अनंतकोटी ब्रह्मांडनायक गोपाळकृष्णावर त्यांचा जीव जडलेला आहे. त्याच्याठायी भक्ती जडलेली आहे. समस्त मानवजातीला योग्य मार्ग दाखऊन प्रकाश देणारा, वाट दाखवणारा, आचारसंहिता शिकवणारा 'श्रीमद्‌भगवद्‌गीता' हा ग्रंथराज आहे यावर त्यांचा अढळ विश्वास आहे. गीतेचा व्यासंग करण्यात ते रमतात, वाचन करताना ते टिपणे काढतात. खास कृष्णाची माहिती प्राप्त करण्यासाठी त्यांनी गर्ग-संहिता वाचून काढली. परमात्मा सत्‌स्वरूपी रामाचा मंत्र ते जपतात.

ते म्हणतात —

"अनंतकोटी ब्रह्मांडनायक श्रीकृष्ण 'मायाधीश' आहेत तर आपण सारे 'मायाधीन' आहोत.

दाम माया का, तोड सका न कोय।

मायेचं हे जाळं त्याच्याशिवाय कोणीच तोडू शकत नाही. मायाधीशाचं ओतप्रोत अस्तित्व कुणीही नाकारु शकत नाही. अनंतकोटी ब्रह्मांडनायक राधेकृष्णास त्रिवार वंदन. . ."

नेटाक्षरीच्या या उपक्रमाला आणी मराठी कविता जगाच्या कानाकोप-यात पोहोचवणा-यांना त्यांनी मनःपूर्वक धन्यवाद दिलेले आहेत.

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥



काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

# नवरस काव्यस्पर्धा मालिका

यात आहेत साहित्यातील नऊ रस
प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा.. एक महामालिकाच म्हणाना!!!

दर महिन्याला एक रस – तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ' हा नाही,
कोणी छोटं - मोठं, कविता चांगली वाईट सिद्ध करणं हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिद्ध होतील, हजारोंपर्यंत जातील, बक्षीसेही असतीलच
लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते!

## या महिन्याचा 'रस' विषय 'वीररस'

तुमच्या 'वीररस' पूर्ण कविता आम्हाला १५ ऑगस्ट, २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
वर पाठवा.
सोबत आपल्या ऑरकुट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

---

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतो आहे. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३६००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही. सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी, तसेच सूचना-अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी
netaksharee@gmail.com